**<u>प्रधानमंत्री ग्रामसडक योजना</u>**

**कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था जिल्हा नाशिक यांचे कार्यालयासाठी फर्निचर खरेदीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०११/प्र.क्र.२९६/यो-०८**
**मंत्रालय,मुंबई-३२**
**दिनांक - ११ ऑक्टोंबर, २०११**

**संदर्भ -** २) अधिक्षक अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) विभाग नाशिक यांचे पत्र क्र.प्रमंग्रासयो/ना.वि.ना/१३६५/२०११, दि. ०७/०९/२०११.

१) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) **जिल्हा नाशिक** यांचे पत्र क्र.म.रा.र.वि.स/.प्रमंग्रासयो/भांडार/५३०/२०११, दि. ०६/०९/२०११.

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो),नाशिक विभाग,नाशिक यांनी कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) , **जिल्हा नाशिक** यांचे कार्यालयाकरीता फर्निचर खरेदीच्या अंदाजपत्रकाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळण्याची शिफारस सदर्भीय पत्र क्र.१ अन्वये केली आहे.

सदर प्रस्तावात नमूद केल्यानुसार कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) , **जिल्हा नाशिक** यांचे कार्यालय नवीन जागेत स्थलांतरीत झालेले असून शासनाने दिलेल्या सूचनेप्रमाणे नवनियुक्त कर्मचा-यांसाठी, कार्यालयाकरीता फर्निचर खरेदी करणे आवश्यक असल्याने अधिक्षक अभियंता , (प्रमंग्रासयो),नाशिक विभाग, नाशिक यांचेकडून कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) , **जिल्हा नाशिक** करीता रु.४,८५,६४८/- इतक्या रकमेची मागणी करण्यात आली आहे.

त्यानुसार अधीक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो),नाशिक विभाग,नाशिक यांनी केलेल्या शिफारशीनुसार कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) , **जिल्हा नाशिक** यांचे कार्यालयाकरीता फर्निचर खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेअंतर्गत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) , **जिल्हा नाशिक** याचे कार्यालयाकरीता विभागीय आयुक्त,नाशिक विभाग,नाशिक यांचेकडील बॅरेक्स नं.२० या इमारतीतील वापरण्यास दिलेल्या कार्यालयाकरीता नवीन फर्निचर खरेदी करण्यासाठी रु.४,८५,६४८/-( रुपये चार लक्ष पंच्याऐंशी हजार सहाशे अठ्ठेचाळीस मात्र ) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) कार्यालयाच्या वापरकरीता सदर इमारतीतील जागेचे रितसर वाटप झालेले आहे, यांची पडताळणी करुनच फर्निचर खरेदी करण्यात यावे.

(२) शासन मान्यता प्राप्त दरपत्रकाप्रमाणे महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळाकडून फर्निचर खरेदी करण्यात यावे.

(३) फर्निचर खरेदी शासनाच्या प्रचलीत मार्गदर्शक तत्वाप्रमाणे करण्यात यावी. तसेच खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करावीत.

(४) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीत फर्निचर खरेदी करण्याची दक्षता घ्यावी.

(५) खरेदी केलेल्या फर्निचरची **जड वस्तूसंग्रह नोंदवहीमध्ये** सही शिक्का व किंमतीसह नोंद घेण्यात यावी.

(६) या फर्निचर खरेदीचा खर्च प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेच्या प्रशासकीय निधीतून भागविण्यात यावा.

२. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०११११०१११११५१२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वॉल्टर डिमेलो)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत -

१) मा. सचिव (ग्रा.वि व पं.रा ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
२) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
३) उप सचिव (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
४) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो), नाशिक विभाग, नाशिक.
५) कार्यकारी अभियंता ,( प्रमंग्रासयो), नाशिक.
६) श्री. सुनिल मोने (वित्तीय नियंत्रक ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
७) कक्ष अधिकारी /योजना-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
८) कक्ष अधिकारी /योजना-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२( निवड नस्ती करीता )

D:\YOJANA-8\CR LETTERCR 296-2011.27.09.11